**कोकण आपत्ती सौम्यीकरण प्रकल्पाअंतर्गत**
**कामांना प्रशासकीय मंजूरी देणेबाबत.**
**(मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि.**
**धुप प्रतिबंधक बंधारे-नुतनीकरण-रायगड -१/७)**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग,**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :-आव्यप्र-२०२४/प्र.क्र.३८/आव्यप्र-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०४ मार्च, २०२४

वाचा:-

१) आपत्ती व्यवस्थापन अधिनियम- २००५.

२) राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण,नवी दिल्ली यांच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सुचना.

३) आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रीय गृह मंत्रालय, भारत सरकार यांच्या दि.१४.०१.२०२२ रोजीच्या मार्गदर्शक सुचना.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१७६/आव्यप्र-१, दि. १० नोव्हेंबर, २०२१.

५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.५५/आव्यप्र-१, दि. ०८ डिसेंबर, २०२१.

६) आपत्ती सौम्यीकरण मुल्यमापन समितीच्या दि.०३.०३.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

७) राज्य कार्यकारी समितीच्या दि.३१.०३.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

८) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. चा शासनासोबत दि. ०७ ऑगस्ट, २०२३ रोजी केलेला सामंजस्य करार .

९) विभागाने मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. ला कामवाटपाबाबत दिलेले पत्र (LoA) क्र. DMU-२०२२/CR-९२/DMU-२, Dt. ३१.०८.२०२३.

१०) कामांच्या नियत वाटपाबाबतचा महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२२/प्र.क्र.९२ /आव्यप्र-२,दि. १४ सप्टेंबर, २०२३.

११) प्रकल्प मुल्यमापन समितीच्या दि.०३.१०.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

१२) तांत्रिक मुल्यमापन समितीच्या दि.२७.१०.२०२३, दि.०८.११.२०२३, दि.२३.११.२०२३ व दि.०१.१२.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

१३) राज्य कार्यकारी समितीच्या दि.०५.१२.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

१४) राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या दि.१९.१२.२०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

१५) सार्वजनिक बांधकाम विभागाचे नोडल अधिकारी नियुक्तीचे पत्र क्र. बैठक-२०२३/प्र.क्र.२६४/रा.म.१,दि ०६.०७.२०२३.

१६) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. यांचे नोडल अधिकारी नियुक्तीचे पत्र क्र. निरंक, दि.२१.०९.२०२३.

१७)आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपद्धतीचा महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र.०१ /आव्यप्र-२, दि.१० जानेवारी, २०२४.

१८) सहायक मुख्य अभियंता यांचे तांत्रिक मान्यते दिल्याचे पत्र क्र. जा.क्र.मुअं (मुं) / का ३ / ४८२ /२०२४, दि. ३०.०१.२०२४.

१९)मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. यांचे पत्र क्र. BCL/DMRR/DPR/AEB ०९ No. s/ TS, दि.०६.०२.२०२४.

**<u>प्रस्तावना</u>:-**

१५ व्या वित्त आयोगाने महाराष्ट्र राज्यासाठी राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी अंतर्गत (State Disaster Mitigation Fund, SDMF) केंद्राने व राज्याने निश्चित केलेल्या आपत्तींचे सौम्यीकरण करण्यासाठी सन २०२१-२२ ते सन २०२५-२६ असा ५ वर्षांकरीता निधी मंजूर केलेला आहे. सदर निधीच्या वापराबाबत आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रीय गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी दि. १४ जानेवारी २०२२ रोजी व राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, नवी दिल्ली यांनी दि. ६ मार्च २०२३ रोजी अन्वये मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत.

२. कोकण आपत्ती सौम्यीकरणांतर्गत ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग या जिल्हयांच्या जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने विविध कामांचे प्रस्ताव शासनास सादर केले होते. जिल्हा प्राधिकरणाकडुन प्राप्त प्रस्तावांमधील सर्व कामांचे नियतवाटप उपरोक्त संदर्भाधीय दि. १४.०९.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये चार शासकीय विभागांना व चार सार्वजनिक उपक्रमांना शासन मान्यतेने नियतवाटप करण्यात आले. एन.डी.एम.ए. च्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व प्रस्ताव प्री-फिझीबीलीटी चेक व डी.पी.आर. च्या नमुन्यात प्राप्त करुन घेण्यात आले. तद्नंतर त्यास प्रकल्प मूल्यमापन समिती व तांत्रिक मूल्यमापन समितीने शिफारशी केल्या. तांत्रिक मूल्यमापन समितीने केलेल्या शिफारशी व सुचविलेल्या सुधारणा यास अधीन राहुन प्रस्तावांना राज्य कार्यकारी समितीने व राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने कामांना व त्याकरीता आवश्यक असणाऱ्या निधीला मंजूरी दिली आहे. त्यानुसार उपरोक्त नमूद संदर्भान्वये प्रकल्प मूल्यमापन समिती व तांत्रिक मूल्यमापन समितीच्या

बैठकांचे तसेच राज्य कार्यकारी समिती व राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या बैठकांचे इतिवृत्त निर्गमित करण्यात आले आहे. त्यानुसार मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. या सार्वजनिक उपक्रम कंपनीला नियतवाटप केलेल्या धूप प्रतिबंधक बंधा-यांच्या कामाला प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोकण आपत्ती सौम्यीकरण प्रकल्पांतर्गत प्रकल्प मुल्यमापन समिती व तांत्रिक मूल्यमापन समितीने शिफारशी केलेल्या तसेच दि. ०५.१२.२०२३ च्या राज्य कार्यकारी समितीमध्ये व दि. १९.१२.२०२३ च्या राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या बैठकीमध्ये मंजुरी दिलेल्या यादीतील अनु. क्र. १२९ वरील मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. या सार्वजनिक उपक्रम कंपनीला नियतवाटप केलेल्या धूप प्रतिबंधक बंधा-यांच्या खालील कामाला व त्यासाठी रु. १५,९५,३२,०००/- इतक्या रकमेस खाली नमुद अटी व शर्तींच्या अधिन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| **कामाचे नाव (धूप प्रतिबंधक बंधारे-नुतनीकरण)** | **अंदाजपत्रकीय रक्कम (रु.)** | **निधी स्रोत व वर्ष** |
|---|---|---|
| अलिबाग, ता. अलिबाग, जि. रायगड.<br><br>Project Code - ०५/०५०१/B/AEB/१<br><br>तांत्रिक मान्यते दिल्याचा पत्र क्र.जा.क्र.मुअं(मुं)/का-३/४८२/२०२४, दि. ३०.०१.२०२४.<br><br>काम पुर्ण करण्याचा कालावधी-१६ महीने. | १५,९५,३२,००० | State २०२३-२४ |

**अटी व शर्ती:**

१) प्रस्तुत मंजूर केलेल्या कामांना मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. सार्वजनिक उपक्रम कंपनीने नियुक्त केलेला नोडल अधिकारी हा या संपूर्ण कामाचा **"संनियंत्रण अधिकारी"** म्हणून काम पाहील.

२) सदरचे काम करताना राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण,नवी दिल्ली यांच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सुचनांचे पालन करणे बंधनकारक राहील.

३) संदर्भाधीन दि. १०.०१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपध्दतीचे ( S.O.P.) पालन करणे बंधनकारक राहील.

४) संदर्भाधिन क्र. ८ येथील दि. ०७.०८.२०२३ रोजी मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीसोबत शासनाने केलेल्या सामंजस्य करारामध्ये नमूद करण्यात आलेल्या सर्व बाबी, अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

५) संदर्भाधीन क्र. ९ अन्वये मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीला कामांचे वाटप करताना दिलेल्या पत्रातील (LoA) सर्व बाबी, अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

६) दि. ०५.१२.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये राज्य कार्यकारी समितीने तसेच दि. १९.१२.२०२३ रोजीच्या बैठकीमध्ये राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाने दिलेले निर्णय व निर्देश यांचे पालन करणे बंधनकारक राहील.

७) संदर्भाधीन दि. १०.०१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपध्दतीमधील ( S.O.P.) परि. २.१२ मधील तरतुदींनुसार कार्यारंभ आदेश देण्यापुर्वी निविदा प्रक्रिया पुर्ण करुन न्युनतम देकाराची निविदा (L-१) व कामाचा दर निश्चितीबाबतची शिफारस या विभागाकडे मान्यतेसाठी करावी.

८) कार्यारंभ आदेश देण्यापुर्वी तांत्रिक मुल्यमापन समितीने सुचविलेल्या सुधारणांची/त्रुटींची पुर्तता करणे बंधनकारक राहील. वित्तीय मान्यता आदेशाशिवाय कार्यारंभ आदेश देण्यात येऊ नयेत.

९) प्रस्तुत काम करताना सार्वजनिक बांधकाम विभागास लागु असलेले सर्व प्रचलित नियम, शासन निर्णय, परिपत्रक व मार्गदर्शक सुचना इत्यादींची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१०) सदर काम करताना DGPS ( Differential Global Positioning System) प्रणालीचा वापर करणे बंधनकारक आहे.

११) सदर प्रशासकीय मान्यता ज्या कामासाठी दिलेली आहे त्याच कामासाठी यातील मंजुर रक्कम खर्च करावी. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजुर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

१२) सदर काम हे निश्चित केलेल्या कालमर्यादेमध्येच पुर्ण करण्यात यावे. विहीत केलेल्या कालावधीत काम पूर्ण करण्याची जबाबदारी ही मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीची राहील. जर काम विहित कालमर्यादेत पुर्ण झाले नाही तर या प्रकरणी मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनी समवेत शासनाने केलेल्या सामंजस्य करारातील (D) Execution of Work मधील Clause १२ व १३ मधे नमुद केल्यानुसार कार्यवाही करण्यात येईल.

१३) कामासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभागास लागु असलेले सर्व प्रचलित शासन निर्णय, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपद्धती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

१४) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीच्या कामांना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ज्या सक्षम प्राधिकाऱ्याने तांत्रिक मंजूरी दिली आहे, त्या अधिकाऱ्यावर संबधित कामाचे पर्यवेक्षण करण्याची तसेच कामाच्या गुणवत्ता व तांत्रिक बाबी यांचे तंतोतत पालन होत आहे, हे पाहण्याची जबाबदारी राहील.

१५) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. ने प्रस्तुत कामांच्या तांत्रिक मान्यता, अंदाजपत्रक व डी.पी.आर. ची एक प्रत सादर केलेली आहे. प्रशासकीय मान्यतेचा हा आदेश प्राप्त झाल्यावर "संनियंत्रण अधिकारी" यांनी तांत्रिक मान्यता, अंदाजपत्रक व डी.पी.आर. ची एक प्रत सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे नोडल अधिकारी "मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, बांधकाम भवन, मुंबई" व संबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास (जिल्हाधिकारी) सादर करावी.

१६) "संनियंत्रण अधिकारी" यांनी आढावा घेऊन दरमहा ५ तारखेपूर्वी कामाचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल विहीत नमुन्यात या विभागास सादर करावा तसेच त्याची एक प्रत सार्वजनिक बांधकाम विभागाचे नोडल अधिकारी "मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, बांधकाम भवन, मुंबई" यांना व संबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास (जिल्हाधिकारी) सादर करावी.

१७) कामाच्या निधी/देयक मागणीचा प्रस्ताव हा विहित प्रपत्रात सार्वजनिक बांधकाम विभागाचे नोडल अधिकारी "मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, बांधकाम भवन, मुंबई" यांच्या मान्यतेनेच या विभागास सादर करावा.

१८) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीने त्यांचे अंमलबजावणी शुल्काचे देयक हे प्रत्यक्षात असलेल्या केवळ संरचनात्मक (Structural) कामाच्या (सामंजस्य करारातील परिच्छेद (C) मधील तरतूदीनुसार) रकमेच्या ३ टक्के /४ टक्के /५ टक्के + जी.एस.टी. याप्रमाणे सादर करावे.

१९) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि. कंपनीने काम पुर्ण केल्यानंतर त्या कामाचे हस्तांतरण करण्याची कार्यवाही संबंधित शासकीय विभागास त्या विभागाने नियम, शासन निर्णय, परिपत्रक इत्यादी

द्वारे निश्चित केलेल्या कार्यपद्धती अनुसार करावी व पर्यवेक्षण करणाऱ्या शासकीय विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडे काम पूर्ण झाल्यानंतर संयुक्त स्वाक्षरीने हस्तांतरण प्रमाणपत्र या विभागास सादर करावे.

२०) काम पुर्ण झाल्यानंतर कामासंदर्भात झालेल्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरित सादर करण्यात यावे.

२१) काम पुर्ण झाल्यानंतर त्या बाबतचे पुर्णत्व प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात यावे.

३. सदरचा शासन निर्णय हा राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाच्या (State Disaster Management Authority) दि. १९.१२.२०२३ रोजीच्या दुसऱ्या बैठकीत झालेला निर्णय व बैठकीत प्राधिकरणाने दिलेले निर्देश यांस अनुसरुन तसेच आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. या कामी होणारा खर्च मागणी सी-६, २२४५, नैसर्गीक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०७ आपत्ती व्यवस्थापन, १०१, आपत्ती सौम्यीकरण (९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरीक्त खर्च (९२) (०१) कोकण आपत्ती सौम्यीकरण प्रकल्प (कार्यक्रम) (२२४५ ४१६१) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मंजुर झालेल्या अनुदानातुन भागविण्यात यावा. त्यासाठी आवश्यकतेप्रमाणे तरतूदी अर्थसंकल्पीत करण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०४१७५११८१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2024.03.04 18:00:59 +05'30'

**( संदीप ना.कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य तथा अध्यक्ष, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. मंत्री,आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.

३) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, मंत्रालय, मुंबई.

४) अपर मुख्य सचिव , वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.

५) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि.

८) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

९) वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) विभागीय आयुक्त कोकण विभाग, कोकण.

११) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष ,जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड.

१२) महालेखापाल (महाराष्ट्र-१) मुंबई/नागपूर.

१३) **नोडल अधिकारी** तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण, बांधकाम भवन, मुंबई.

१४) श्री. संतोष बबनराव मोहिते, **नोडल अधिकारी** तथा महाव्यवस्थापक (प्रकल्प), मे. ब्रेथवेट अँड कंपनी लि.,४४/अ, नरिमन भवन, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१.

१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

१६) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.

१७) कक्ष अधिकारी, कार्यासन म-११, आ.व्य.म.व पु, मंत्रालय, मुंबई.

१८) कक्ष अधिकारी, (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९) निवड नस्ती/ आव्यप्र-२.